**केंद्र शासनाच्या स्वच्छ भारत अभियान (नागरी) च्या धर्तीवर राज्यामध्ये - "स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी)" राबविण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
नगर विकास विभाग,
शासन निर्णय, क्रमांक स्वभाअ २०१५/ प्र.क्र.२३/ नवि ३४
हुतात्मा राजगुरू चौक, मदाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०००३२
दिनांक : २४ सप्टेंबर, २०१५

वाचा : शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्रमांक स्वभाअ २०१५/प्र.क्र.२३/नवि-३४, दिनांक १५ मे, २०१५

**प्रस्तावना:**

केंद्र शासनाच्या स्वच्छ भारत अभियान (नागरी) च्या धर्तीवर राज्यामध्ये **- "स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी)"** हे एक अभियान म्हणून राबविण्यास संदर्भीय दिनांक १५.५.२०१५ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. अशी मान्यता देताना - "क" वर्ग नगरपालिका व नगरपंचायती मधील शौचालयांचे बांधकाम व त्यासाठी आवश्यक क्षमता बांधणी, प्रचार, प्रसार व प्रसिध्दि आणि जनजागृती पाणी पुरवठा व स्वच्छता विभागामार्फत करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

२. तथापी, ग्रामीण भागाच्या कृती आराखडयानुसार सन २०१५-१६ मध्ये ग्रामीण भागामध्ये जवळपास १५ लक्ष वैयक्तीक शौचालयांचे बांधकाम करावयाचे असल्याने नागरी भागातील शौचालय बांधकामाचे उद्दिष्ट पार पाडणे "वासो" या पाणी पुरवठा विभागांतर्गत सहाय्यक यंत्रणेला शक्य होणार नसल्याने - "क" वर्ग नगरपालिका व नगरपंचायती मधील शौचालय बांधकाम नगर विकास विभागामार्फत पाहणे योग्य राहील असे अभिप्राय पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाने दिले आहेत. पाणी पुरवठा स्वच्छता विभागाचे अभिप्राय विचारात घेता स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) अंतर्गत - "क" वर्ग नगरपालिका व नगरपंचायती मधील शौचालयांचे बांधकाम व त्यासाठी आवश्यक क्षमता बांधणी, प्रचार, प्रसार व प्रसिध्दि आणि जनजागृती हे कार्यक्रम नगर विकास विभागामार्फत राबविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

प्रस्तावनेत नमूद केलेल्या बाबींचा विचार करून, **- "स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी)"** अंतर्गत - "क" वर्ग नगरपालिका व नगरपंचायती मधील शौचालयांचे बांधकाम व त्यासाठी आवश्यक क्षमता बांधणी, प्रचार, प्रसार व प्रसिध्दि आणि जनजागृती हे कार्यक्रम नगर विकास विभागामार्फत राबविण्यास शासन मान्यता देत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१५०९२८१२५८०५५६२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षंकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sudhakar Dnyandeo Bobade

Digitally signed by Sudhakar Dnyandeo Bobade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2e4705465b9bdfd5b38b2d36aae83659869796cb8cc2aefbc550989feec27db1, cn=Sudhakar Dnyandeo Bobade
Date: 2015.09.28 13:01:59 +05'30'

**(सुधाकर ज्ञा. बोबडे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मंत्री, यांचे खाजगी सचिव (सर्व).
४. मा. राज्यमंत्री, यांचे खाजगी सचिव (सर्व).
५. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा. अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता, मंत्रालय, मुंबई
९. प्रधान सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. प्रधान सचिव (नगर विकास-१), मंत्रालय, मुंबई.
१२. सचिव (नगर विकास-२), मंत्रालय, मुंबई.
१३. आयुक्त तथा संचालक, नगर परिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.
१४. सचिव, आदिवासी विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. महासंचालक, अखिल भारतीय स्थानिक स्वराज्य संस्था.
१६. महासंचालक, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७. महालेखाकार (लेखा व अनुज्ञेयता)-१, मुंबई.
१८. महालेखाकार (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपूर.
१९. सर्व विभागीय आयुक्त.
२०. सर्व जिल्हाधिकारी.
२१. उप सचिव (अर्थसंकल्प), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
२२. आयुक्त, सर्व महानगरपालिका.
२३. मुख्याधिकारी, सर्व नगरपरिषदा/ नगर पंचायती.
२४. निवडनस्ती (नवि-३४).